**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: डीएपी- २०२५/प्र.क्र.२६(भाग-१)/सामासु
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- ३ मार्च,२०२५.

विषय :- स्थानबध्दता केंद्राच्या संचलनासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत..
सन २०२४-२५ (लेखाशिर्ष २२३५ १७५५,२६ जाहिरात व प्रसिध्दी)

संदर्भ :- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र.स्थाकेंस्था-०८१९/प्र.क्र.२७१/सामासु दि.२५.७.२०२४
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,पत्र क्र.स्थान-२०२३/प्र.क्र.५१६/सामासु, दि.२१.१.२०२५ (दि.१५.१.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त)

**ज्ञापन :-**

व्हिसा मुदत संपुष्टात आलेले विदेशी नागरिक,कारागृहातून शिक्षा भोगून मुक्त झालेले विदेशी नागरिक तसेच विविध कारणास्तव मायदेशी परत न गेलेल्या विदेशी नागरिकांना स्थानबध्द करण्याच्या अनुषंगाने भोईवाडा मध्यवर्ती कारागृह, मुंबई येथे तात्पुरत्या स्वरुपातील स्थानबध्दता केंद्र तसेच राज्य राखीव पोलीस बल,गट क्रमांक११,बाळेगांव,नवी मुंबई,जि.ठाणे येथे कायमस्वरुपी स्थानबध्दता केंद्र सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्यामार्फत चालविण्यात यावे,असा निर्णय गृह विभागाकडून दि.२५ जुलै,२०२४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये भोईवाडा,मुंबई येथील ८० क्षमतेच्या तात्पुरत्या स्थानबध्दता केंद्राच्या संचालनासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या खर्चाची रक्कम रू.१,३२,६९,५७६/- इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

२. सदर बाब विचारात घेवून संदर्भाधीन दिनांक २५ जुलै,२०२४च्या शासन निर्णयाप्रमाणे भोईवाडा,मुंबई येथील तात्पुरत्या स्थानबध्दता केंद्राच्या संचालनासाठी आवश्यक असलेली रक्कम ही व्यसनाधीन व्यक्तीसाठी अंमली पदार्थ सेवन विरोधी मोहिम चालविणे,त्यांच्यावर उपचार करणे आणि व्यसनाधीन व्यक्तीचे पुनर्वसन करणे या योजनेअंतर्गत **लेखाशिर्ष २२३५ १७५५,२६** जाहिरात व प्रसिध्दी या बाबीखाली मंजूर तरतुदीमधून **रू.१,३२,६९,५७६/-** (अक्षरी रूपये एक कोटी बत्तीस लक्ष एकोणसत्तर हजार पाचशे शहात्तर फक्त ) इतकी रक्कम खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) योजनेतंर्गत वितरीत करण्यात आलेला निधी त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावा.
(२) प्रत्येक देयकावर अचूक लेखाशिर्ष व आठ अंकी संकेतांक नमूद करण्याची खबरदारी घ्यावी.
(३) निधी वितरीत करतांना उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांनी तपासावे.
(४) वितरीत निधीच्या खर्चाचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयाच्या नोंदीशी घालावा व तसा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र तीन महिन्यात शासनास सादर करण्यात यावे.
(५) यापुर्वी वितरीत निधीच्या अनुषंगाने कोणताही लेखा आक्षेप नाही, याची खातरजमा करण्यात यावी.

३. सदर निधी हा "मागणी क्रमांक एन-३, २२३५,१०५,दारूबंदी, (०२) स्वयंसेवी संस्थाना सहाय्य (०२)(०१),व्यसनाधीन व्यक्तीसाठी अंमली पदार्थ सेवन विरोधी मोहिम चालविणे,त्यांच्यावर उपचार करणे,आणि व्यसनाधीन व्यक्तींचे पुनर्वसन करणे याकरीता स्वयंसेवी संस्थांना वित्तीय सहाय्य (कार्यक्रम ) (२२३५ १७५५) ,२६,जाहिरात व प्रसिध्दी"या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२०२५ च्या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीमधुन भागविण्यात यावा.

४. सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७४/२०२५/ व्यय१४, दि.१४.२.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर ज्ञापन हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सकेतांक क्रमांक २०२५०३०३१५४३३५७७२२ असा आहे.हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH SADASHIV
MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2025.03.03 15:45:00 +05'30'

**(राजेश मांजरेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे
२. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
३. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
४. पोलीस महासंचालक तथा सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ, वर्ल्ड ट्रेड सेंटर, ३२ वा मजला, मुंबई-४००००५.
५. अपर पोलीस महासंचालक व निरीक्षक,कारागृह व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य,मुंबई
६. जिल्हाधिकारी,मुंबई शहर
७. पोलीस उप आयुक्त तथा प्रादेशिक विदेशी नागरीक नोंदणी अधिकारी,विशेष शाखा-२,मुंबई
८. कार्यकारी अभियंता,मध्य मुंबई (सा.बां. )विभाग,मुंबई
९. उपायुक्त (नाहसं),समाज कल्याण,पुणे
१०. प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण मुंबई विभाग
११. सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण मुंबई शहर
१२. महालेखापाल- महाराष्ट्र- १ व २ (लेखा परिक्षा )/( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर .
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई /मुंबई उपनगर
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१५. कक्ष अधिकारी,गृह विभाग,(विदेशी-१ )मंत्रालय,मुंबई
१६. कक्ष अधिकारी ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प ),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१८. निवडनस्ती (सामासु)